**स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेतलेल्या रुग्णांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती करण्यासाठी मा.मुख्यमंत्री सहायता निधीतून घेतलेल्या रु.३.०० कोटी इतक्या रकमेची परतफेड करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः स्वाईन-२०१५/पूरमा/प्र.क्र.३०१/आरोग्य-५**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,
संकुल इमारत, १० वा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
तारीख : ३१ ऑक्टोबर, २०१५.

वाचा -

१) **सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. स्वाईन २०१५/प्र.क्र.११३/आ-५, दि. २० मार्च, २०१५.**

२) **संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/स्वाईन फ्ल्यू/खर्चाची प्रतिपुर्ती/कक्ष-६/ पुरवणीमागणी अनुदान/२१९४-९६/१५, दि.१६/०६/२०१५.**

३) **सहसंचालक, आरोग्य सेवा (हि. ह. व ज.रो.), पुणे-१ यांचे पत्र क्र.ससंआसे/स्वाईन फ्ल्यू रुग्ण प्रतिपुर्ती/पुरवणी अनुदान/३२८९६-९७/कक्ष-५८/१५, दि.१४/०९/२०१५.**

**प्रस्तावना -**

राज्यात १ जानेवारी, २०१५ पासून स्वाईन फ्ल्यू आजाराचे रुग्ण बऱ्याच प्रमाणात आढळून आहे. परिणामत: मृतांच्या संख्येत देखील वाढ झाली होती. त्यातच बरेच रुग्ण स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात उपचार घेत होते. हे लक्षात घेता मा.मुख्यमंत्री महोदयांनी दि. २ मार्च, २०१५ पासून जे रुग्ण खाजगी रुग्णालयात गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर उपचार घेत आहेत, अशा रुग्णांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती करण्यात येईल, असे जाहीर केले होते. त्यानुसार वरील वाचा क्र.१ येथे नमुद दि. २० मार्च, २०१५ रोजी शासन निर्णयान्वये दि. २ मार्च, २०१५ पासून स्वाईन फ्ल्यू आजाराचे गरीब, आर्थिक दुर्बल घटकातील किंवा तत्सम रुग्ण जे खाजगी रुग्णालयात व्हेंटिलेटर (Ventilator) किंवा तत्सम लाईफ सपोर्टवर उपचार घेत असतील अशा रुग्णांना शासनामार्फत वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती करण्यात येईल, असा निर्णय घेण्यात आहे. सदर शासन निर्णयान्वये घेतलेल्या निर्णयानुसार खाजगी रुग्णालयात स्वाईन फ्ल्यू आजारावर उपचार घेतलेल्या रुग्णांना वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती करण्याकरिता निधी उपलब्ध नसल्याने, मुख्यमंत्री सहायता निधीतून रु.३.०० कोटी इतका निधी परतफेड करण्याच्या अटीवर संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

मुख्यमंत्री सहायता निधीतून घेतलेल्या रु.३.०० कोटी इतक्या रकमेच्या प्रतिपुर्तीसाठी विधानमंडळाच्या जुलै, २०१५ च्या पावसाळी अधिवेशनात सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत (२२१० ०६२९-योजनेतर), (०१)(०६) पटकी नियंत्रण कार्यक्रम (राज्य क्षेत्र) या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ साठी रु.३.०० कोटी इतक्या रकमेची आर्थिक तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतूदीतून मुख्यमंत्री सहायता निधीतून घेतेलेल्या रु. ३.०० कोटी इतक्या रकमेची परतफेड करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. शासन याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

स्वाईन फ्ल्यू आजारावर खाजगी रुग्णालयात गंभीरस्थितीत जीवनावश्यक प्रणालीवर उपचार घेतलेल्या रुग्णांना शासनामार्फत वैद्यकीय खर्चाची प्रतिपुर्ती करण्यासाठी मुख्यमंत्री सहायता निधीतून घेतलेला रु. ३, ००,००,०००/- ( **अक्षरी रुपये तीन कोटी फक्त)** इतका निधी मुख्यमंत्री सहायता निधीस परतफेड करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदरचा खर्च खालील दर्शविलेल्या लेखाशिर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षासाठी मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्र. आर- १
२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य,
१०१, रोग प्रतिबंध व नियंत्रण,
०१, रोगप्रतिबंध व नियंत्रण,
(०१) (०६) पटकी नियंत्रण कार्यक्रम (राज्य क्षेत्र)
(२२१० ०६२९) (योजनेतर)
१३, कार्यालयीन खर्च

पटकी नियंत्रण कार्यक्रमांतर्गत मुख्यमंत्री सहायता निधीस परतफेड करण्यासाठी वितरीत केलेल्या निधीचा ताळमेळ राखण्यासाठी सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना “**नियंत्रक अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर अनुदानाशी संबंधीत देयके अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना **“आहरण व संवितरण अधिकारी”** म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी रु.३,००,००,०००/- इतक्या रकमेचे देयक कोषागारातून पारित करुन घेऊन, सदर रकमेचा धनादेश /धनाकर्ष “मुख्यमंत्री सहायता निधी” किंवा “Chief Minister Relief Fund” या नावे काढून मुख्यमंत्री सचिवालय, मुख्यमंत्री सहायता निधी कक्षास सुर्पुद करावा; किंवा मुख्यमंत्री सहायता निधी खाते, स्टेट बँक ऑफ इंडिया, शाखा फोर्ट (मेन), मुंबई, खाते क्र.००१०९७२४३३७५१, ब्रॉन्च कोड नं.३००, आयएफसीसी कोड नं.SBIN0000300 या खात्यावर **RTGS** द्वारे भरणा करावा व त्याची पोच उप सचिव (आरोग्य-५), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई यांना सादर करावी.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, व्यय-१३ शाखेच्या अनौ.सं.क्र.**५३३**/व्यय-१३, दि.५/१०/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०३११२०२३४४०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Hanumant Karanjekar

Digitally signed by Sanjay Hanumant Karanjekar
DN: CN = Sanjay Hanumant Karanjekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.10.31 17:43:38 +05'30'

**( सं. ह. करंजेकर )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
२) उप सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुख्यमंत्री सहायता निधी कक्ष, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
६) सहसंचालक, आरोग्य सेवा (हि.ह. व ज.रो.), पुणे.
७) सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८) प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालयनालय, मुंबई.
९) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
१०) महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
११) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१२) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३) प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१४) वित्त विभाग, (व्यय-१३) (अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई.
१५) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा)/(लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती (आरोग्य-५).